**राज्याची सामायिक सुविधा निर्माण करण्याकरीता उद्योग समूह प्रकल्पांना अनुदान योजनेंतर्गत टेक्स्टाईल अँड गारमेंट डिजिटल प्रिंटींग क्लस्टर, मिरज जि. सांगली या उद्योग समूह प्रकल्पाच्या सामायिक सुविधा केंद्र उभारणीसाठी प्रथम टप्प्यातील अनुदान मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. क्लस्टर-२०२३/प्र.क्र.४८/उद्योग-७,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०२/०३/२०२३

**संदर्भ**:- १) केंद्रीय सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम मंत्रालय, भारत सरकार यांची MSE-CDP योजनेबाबतची मार्गदर्शक तत्त्वे.

२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. एसएमई-२००९/ (२२९)/ उद्योग-७, दिनांक ०९/०६/२०१०.

३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. एसएमई-२०१०/ (१०१७)/ उद्योग-७, दिनांक २२/१०/२०१०.

४) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन परिपत्रक क्र.एसएमई-२०१०/प्र.क्र.१०१७/उद्योग-७, दिनांक ०२/०६/२०१५.

५) केंद्र शासनाचे अंतिम मंजूरी आदेश क्र.१(१३४१)/CDD/CFC/Digital Printing/२०२२, दिनांक १७/०५/२०२२.

६) उद्योग संचालनालयाचे मंजुरी आदेश क्र. DI/ Cluster/ Sanction Order/ Garment Digital Printing Cluster/ Miraj/ २०२३/C-२५४३, दिनांक २३/०२/२०२३.

७) उद्योग सह संचालक (औसशा), उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. उसं/ औसशा/ इंजिनिअरिंग क्लस्टर/ सांगली/ २०२३/ सी-२४४५, दिनांक २३/०२/२०२३.

**प्रस्तावना**:-

केंद्र शासनाच्या सूक्ष्म व लघु उपक्रम - समूह विकास योजनेतून (MSE-CDP) प्रकल्प उभारणीस हातभार लावण्याच्या दृष्टीने तसेच प्रकल्पाच्या किफायतशीरपणात वाढ होणेसाठी "राज्याची सामायिक सुविधा निर्माण करण्याकरिता उद्योग समूह प्रकल्पांना अनुदान योजना" ही योजना दिनांक ०९/०६/२०१० च्या शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात आलेली आहे. तसेच दिनांक २२/१०/२०१० रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर योजनेंतर्गत राज्य शासनाचा सहभाग प्रकल्प किमतीच्या १०% इतका (उच्चत्तम अनुदान मर्यादा रुपये १.५० कोटी) निश्चित करण्यात आलेला आहे. सदर योजनेंतर्गत केंद्र शासनाने त्यांच्या दिनांक १७/०५/२०२२ रोजीच्या आदेशान्वये टेक्स्टाईल अँड गारमेंट डिजिटल प्रिंटींग क्लस्टर, मिरज जि. सांगली या औद्योगिक समूह प्रकल्पास सामायिक सुविधा केंद्र उभारणीसाठी अंतिम मंजूरी दिली असून प्रकल्प उभारणींतर्गत राज्य शासनाचे सहभाग अनुदान रुपये १४९.९९ लक्ष इतके राहणार आहे.

२. सूक्ष्म, लघु उपक्रम- समूह विकास योजनेच्या (MSE-CDP) मार्गदर्शक सूचनांप्रमाणे सदर योजनेंतर्गत मंजूरीप्राप्त प्रकल्पांना केंद्र शासनाचे मंजूर अनुदान ४०:३०:३० या प्रमाणात वितरीत करण्यात येते. तसेच केंद्र शासनाचे मंजूर अनुदान वितरीत होणेसाठी राज्य शासनाचे सहभाग अनुदान केंद्र शासनाच्या प्रस्तावित अनुदानाच्या प्रमाणात वितरीत होणे आवश्यक आहे. तथापि, MSE-CDP योजनेच्या सुधारीत मार्गदर्शक सूचनांनुसार राज्य शासनाचे सहभाग अनुदान जास्त प्रमाणात (high share) वितरीत केल्यास संबंधित प्रकल्पास केंद्र शासनाच्या मंजूर अनुदानापैकी ५०% अनुदान एकाच टप्प्यात वितरीत करण्यात येते.

३. टेक्स्टाईल अँड गारमेंट डिजिटल प्रिंटींग क्लस्टर, मिरज जि. सांगली या औद्योगिक समूह प्रकल्पास राज्य शासनाचे सहभाग अनुदान जास्त प्रमाणात (high share) वितरीत केल्यास योजनेच्या सुधारीत मार्गदर्शक

सूचनांनुसार केंद्र शासनाचे एकूण मंजूर अनुदान रुपये १५९९.८४ लक्ष रकमेपैकी रुपये ७९९.९२ लक्ष इतकी रक्कम प्राप्त होईल. त्यामुळे राज्यातील प्रकल्प जलदगतीने पूर्ण होणेसाठी टेक्स्टाईल अँड गारमेंट डिजिटल प्रिंटींग क्लस्टर, मिरज जि. सांगली या औद्योगिक समूह प्रकल्पास रुपये १,०४,९९,३००/- इतकी रक्कम राज्य शासनाच्या सहभाग अनुदानापोटी प्रथम टप्प्यांतर्गत वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

केंद्र शासनाने सूक्ष्म व लघु उपक्रम-समूह विकास योजनेंतर्गत (MSE-CDP टेक्स्टाईल अँड गारमेंट डिजिटल प्रिंटींग क्लस्टर, मिरज जि. सांगली या प्रकल्पास सामायिक सुविधा केंद्र उभारणीसाठी दिनांक १७/०५/२०२२ रोजीच्या आदेशान्वये अंतिम मंजूरी दिली असून एकूण मंजूर प्रकल्प किंमत रुपये १९९९.८० लक्ष इतकी असून त्याअंतर्गत केंद्र शासनाचे अनुदान रुपये १५९९.८४ लक्ष व राज्य शासनाचे सहभाग अनुदान रुपये १४९.९९ लक्ष इतके आहे. त्याअनुषंगाने टेक्स्टाईल अँड गारमेंट डिजिटल प्रिंटींग क्लस्टर, मिरज जि. सांगली या औद्योगिक समूह प्रकल्पास प्रकल्प मंजूरीप्रमाणे राज्य सहभाग अनुदान रुपये १४९.९९ लक्ष इतक्या रकमेपैकी प्रथम टप्प्यांतर्गत रुपये १,०४,९९,३००/- (अक्षरी रुपये एक कोटी चार लक्ष नव्याण्णव हजार तिनशे फक्त) इतकी रक्कम प्रस्तुत योजनेतील तरतूदीनुसार वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांनी रुपये १,०४,९९,३००/- (अक्षरी रुपये एक कोटी चार लक्ष नव्याण्णव हजार तिनशे फक्त) ही रक्कम शासकीय कोषागारातून टेक्स्टाईल अँड गारमेंट डिजिटल प्रिंटींग क्लस्टर, मिरज जि. सांगली या प्रकल्पाच्या विशेष हेतू वाहन संस्थेला देण्याची व्यवस्था करावी. उपरोक्त रुपये १,०४,९९,३००/- (अक्षरी रुपये एक कोटी चार लक्ष नव्याण्णव हजार तिनशे फक्त) ही रक्कम आहरण व संवितरण करावयाचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना देण्यात येत आहेत.

३. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांनी सदर विशेष हेतू वाहन संस्थेच्या प्रगतीवर व दिलेल्या शासकीय भागभांडवलाच्या सुयोग्य वापरावर व विनियोगावर देखरेख ठेवण्याची आवश्यक ती कार्यवाही करावी.

४. वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. अर्थसं २०२२/ प्र.क्र.४३/ अर्थ-३, दिनांक ०४/०४/२०२२ व त्यासोबतच्या परिशिष्टातील तरतुदीनुसार तसेच त्याअनुषंगाने उद्योग संचालनालयाकडून प्राप्त माहितीनुसार असे प्रमाणित करण्यात येते की, टेक्स्टाईल अँड गारमेंट डिजिटल प्रिंटींग क्लस्टर, मिरज जि. सांगली या प्रकल्पास केंद्र शासनाने त्यांच्या दिनांक १७/०५/२०२२ रोजीच्या आदेशान्वये अंतिम मंजूरी दिलेली आहे. उद्योग विभागाचे शासन परिपत्रक क्र. एसएमई-२०१०/(१०१७)/उद्योग-७, दि.२२/१०/२०१० अन्वये राज्य शासनाचे आर्थिक सहभागासंबंधी अनुदानाची कमाल मर्यादा निश्चित केलेली आहे. सदर मर्यादेच्या अधिन राहून उद्योग संचालनालयाने दिनांक २३/०२/२०२३ रोजी संबंधित प्रकल्पाचे अनुदान मंजूरी आदेश निर्गमित केले आहेत. तसेच सदर प्रकल्पास प्रथमतःच अनुदान वितरीत करण्यात येत आहे. सदर योजनेअंतर्गत यापूर्वी वितरीत केलेल्या ७५ टक्केपेक्षा अधिक निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झालेले आहे. वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरीक्षक/ महालेखापाल यांच्याकडून कोणतेही आक्षेप नाहीत.

५. याकरीता होणारा खर्च "मागणी क्रमांक के-७, २८५१-ग्रामोद्योग व लघु उद्योग, (००) १०२ लघुउद्योग-केंद्र पुरस्कृत योजना (००) (२३) मंजूर औद्योगिक समूह प्रकल्पांतर्गत सामायिक व पायाभूत सुविधा विकास योजना-केंद्र शासनाचा सूक्ष्म व लघु उपक्रम-समूह विकास कार्यक्रम व औद्योगिक पायाभूत सुविधा विकास श्रेणीवाढ (आयआययूएस) (२८५१ ५४०६) ३३-अर्थसहाय्य (योजनांतर्गत)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२२-२३ या वित्तीय वर्षामध्ये या लेखाशिर्षाखाली मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात यावा.

६.      हा शासन निर्णय, वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४/०४/२०२२ मधील परिच्छेद ३ व त्यासोबतच्या परिशिष्टामधील अटींची पूर्तता होत असल्याने प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७.      सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२३०३०२१५३२४३४८१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY SHAMKANT DEGAONKAR

Digitally signed by SANJAY SHAMKANT DEGAONKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=56CF8C8577584ADC42F070185C585C41084CC34F6683553D21CCACBFA33D4D1F, cn=SANJAY SHAMKANT DEGAONKAR
Date: 2023.04.05 13:44:02 +05'30'

**( संजय देगांवकर )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई-३२. (पाच शाईच्या सहीच्या प्रती)
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
५) संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई.
६) उद्योग सह संचालक, पुणे विभाग. (उद्योग संचालनालयामार्फत)
७) महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, सांगली. (उद्योग संचालनालयामार्फत)
८) टेक्स्टाईल अँड गारमेंट डिजिटल प्रिंटींग क्लस्टर, मिरज जि. सांगली. (उद्योग संचालनालयामार्फत)
९) नियोजन विभाग (कार्यासन १४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
१०) वित्त विभाग (कार्यासन व्यय-१६), मंत्रालय, मुंबई-३२.
११) अवर सचिव (कार्यासन प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) निवड नस्ती (कार्यासन उद्योग-७).